वितरण आदेश क्र. ९

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी पुणे या संस्थेच्या प्रोजेक्ट मॅनेजमेंट इमारतीच्या बांधकामाकरिता वित्तीय मान्यता देऊन, उर्वरित निधी वितरीत करणेबाबत.
( योजनांतर्गत सन २०१६-१७ )

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यशदा २०१६/८८२/प्र.क्र.१९०/१६/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक १९ डिसेंबर, २०१६

**संदर्भ :-**
१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.यशदा २०११/१५३६/ प्रक्र.२७/११ /१२-अ दि.३१.३.२०११
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.यशदा २०१३/१३५३/ प्रक्र.१३८/१३ /१२-अ दि.११.३.२०१४
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८०/अर्थसंकल्प,३ दि.१ एप्रिल, २०१६.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१६/ प्र.क्र.५२ /२०१६/२५, दि.६ एप्रिल, २०१६
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८९/अर्थसंकल्प,३ दि. २० एप्रिल, २०१६.
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र .- बीयुडी२०१६-/ प्र.क्र ५२./२०१६/२५, दि. २२ एप्रिल, २०१६.
७. लेखाअधिकारी, यशदा पुणे यांचे यशदा /बजेट१६-१७/न.क्र.६५/१२१८/२०१६ दि.१५.१०.२०१६

**प्रस्तावना :-**

यशदा, पुणे या संस्थेच्या स्थावर विभागाने तयार केलेल्या प्रोजेक्ट मॅनेजमेंट इमारतीच्या बांधकामाच्या रु.३,२२,५७,८६४/- इतक्या रकमेच्या प्राथमिक खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येऊन रु. १.३० कोटी इतके सहायक अनुदान खर्चासाठी उपलब्ध करुन देण्यात आले होते. तदनंतर, संस्थेचा जागेचा बिकट प्रश्न लक्षात घेऊन प्रोजेक्ट मॅनेजमेंट बिल्डींग (G+४) च्या इमारत बांधकामास संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये रु.७,१७,५९,११२/- एवढ्या रकमेस सुधारित प्रशासकीय व वित्तीय मान्यता देऊन रु. ४६६.६० लाख इतका निधी संस्थेस वितरित करण्यात आला आहे. संस्थेस आतापर्यंत एकूण रु.५९६.६० लाख ( रु. पाच कोटी, शहयाण्णव लाख, साठ हजार फक्त ) इतका निधी वितरित करण्यात आला आहे. संस्थेने या कामाच्या अनुषंगाने सदर रकमेच्या विनियोगाचे पृष्ठयर्थ उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.

आता संदर्भाधीन क्र. ७ च्या पत्रान्वये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून उर्वरित निधीची मागणी शासनाकडे केली आहे.

**शासन निर्णय :**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी पुणे या संस्थेस सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षाकरिता मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशीर्ष २०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण - राज्य योजनांतर्गत योजना (००)(०३) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहाय्यक अनुदान ( २०७० ००७६ ) ३१-सहायक अनुदान वेतनेतरर या लेखाशीर्षाखाली संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन परिपत्रकान्वये रु.१२१.०० लाख इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी संदर्भाधीन क्रमांक ४ च्या शासन परिपत्रकान्वये तरतूदीच्या अनुषंगाने, एप्रिल व मे , २०१६ या २ महिन्यांसाठी एकूण रु.२०.१७ लाख एवढे लेखा अनुदान खर्चासाठी उपलब्ध करुन देण्यात आले होते. यामधून अद्याप कोणताही खर्च करण्यात आलेला नाही. संदर्भाधीन क्र.५ च्या शासन परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पीय अनुदानाच्या ८०% च्या मर्यादेत, रु.९६.८० लाख इतके सहायक अनुदान खर्चाकरिता, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

आता संदर्भाधीन क्र. ६ च्या शासन परिपत्रकान्वये सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाच्या योजनांतर्गत खर्चासाठी संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे. यामधून आतापर्यंत कोणताही खर्च झालेला नाही.

३. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी पुणे या संस्थेस, प्रोजेक्ट मॅनेजमेंट बिल्डींग (G+४) च्या इमारत बांधकामास रु.७,१७,५९,११२/- ( सात कोटी, सतरा लाख, एकोणसाठ हजार, एकशे बारा फक्त ) एवढया रकमेच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत आतापर्यंत वितरित केलेले रु.५९६.६० लाख ( रु. पाच कोटी, शहयाण्णव लाख, साठ हजार फक्त ) इतका निधी वगळून, वरीलप्रमाणे मंजूर झालेल्या अनुदानातून ८० % च्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर योजनांतर्गत खर्चासाठी उपलब्ध असलेल्या रु.९६.८० लाख इतक्या निधीस, वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग पाच, अनुक्र.१, परिच्छेद क्र.१३४ नुसार व सदर अधिकारातील रकाना क्र ६. खालील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन, वित्तीय मान्यता देण्यान येत आहे.

तसेच, आता संस्थेस रु. ९६,८०,००० /- (अक्षरी रुपये शहयाण्णव लाख , ऐंशी हजार फक्त) इतका निधी सहायक अनुदान म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

४. यावर होणारा खर्च रु. ९६,८०,००० /- ( अक्षरी रुपये शहयाण्णव लाख , ऐंशी हजार फक्त ) मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशीर्ष २०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण - राज्य योजनांतर्गत योजना (०३)(००)यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहायक अनुदान-३१ (२०७० ००७६) सहायक अनुदान वेतनेतर या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१,मुंबई व शासनाला तातडीने सादर करावे.

७. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. क्र. अर्थसं/२०१६ प्र.क्र.८९/अर्थसंकल्प,३ दि. २० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२१९१५३९०८०४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2016.12.19 15:50:05 +05'30'

**( अजित देशमुख )**
**अवर सचिव , महाराष्ट्र शासन.**

**प्रत**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) , महाराष्ट्र-१, मुंबई,
२) मा. प्र. स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५) लेखाधिकारी ,यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
६) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
७) सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
८) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग कार्या/१२ अ.